नवनाथ भक्तिसार    अध्याय चोवीसावा

तीर्थाटनासाठी निघालेल्या नाथांनी मजल दरमजल करीत गर्भाद्री पर्वताचा पायथा गाठला. संपूर्ण प्रवासात गोरक्षनाथांना कटाक्षाने एक जाणवले की, "श्रीगुरु मच्छिंद्रनाथांचे चित्त स्थिर नाही. काही एका अनामिक भयाने ते कावरेबावरे होत होते आणि तस्करांकडून, वाटमाऱ्यांकडून आपल्याला धोका संभवतो असे भाकीत का वर्तवीत आहेत? याचा अर्थ महाराजांकडे निश्चितच काहीतरी मौल्यवान वस्तू आहे. संधी मिळताच गोराक्षांनी झोळीत पहिले, तर सोन्याची वीट! गोराक्षांनी ती सुवर्ण वीट महाराजांच्या नकळत भिरकावून दिली आणि त्याच वजनाचा दगड झोळीत टाकला. काहीसा अवधी लोटल्यावर, झोळीत सुवर्णाची वीट नसून दगड आहे हे महाराजांच्या लक्षात आले आणि त्यांनी खूपच त्रागा केला आणि गोरक्षाची निर्भत्सना केलीच शिवाय तुझा माझा संबंध संपला असेही ऐकविले. गोष्ट या थराला गेल्यावर गोरक्षाने सिद्धयोग मंत्राचा जप करून गर्भाद्री डोंगराचा माथा सुवर्णाचा केला आणि गुरूंना थक्क केले. खरं तर महागुरूंना ती वीट मोडून संत सज्जनासाठी भंडारा घालवायचा होता. हे समजल्यावर गुरुंविषयी आपण गैरसमज बाळगून होतो. वास्तव काही निराळेच असल्याने त्यांनी गंधर्वास्त्र जपून चित्रसेन गंधर्वाला पाचारण केले आणि महागुरूंची इच्छा पूर्ण केली. फार मोठा आणि दैदीप्यमान स्वरूपात आनंदोस्तव साजरा केला. संतसज्जनापासून ऋषी, देवाधी देव इंद्र, जपी, तपी सह अष्टवसुं उपरिचसह ब्रम्हा, विष्णु, महेशही उपस्थित होते. विशेष म्हणजे गहीनीला सुद्धा त्याच्या पलकासह, मधुभटासह पाचारण केले होते.

एका सुवर्णविटेसाठी सुवर्णगिरीची निर्मिती तपोजेठी गोरक्षाने केली याची रसाळ कथा ऐकवून झाल्यावर ग्रंथकार आता भर्तरी आख्यानांचे साद्यंत निरुपण करीत आहेत.

भर्तरी म्हणजे भिक्षापात्र. सूर्यदेव नित्यनियमांप्रमाणे प्रकाशाची उधळण करीत सप्त अश्वांच्या तेजस्वी आणि दिमाखदार अशा रथातून चालले होते. त्याचवेळी उर्वशी नामक लावण्यवती अप्सरा पृथ्वीतलावर येत होती. तिच्या अप्रतिम सौंदर्याने सूर्यदेव कमांध झाले. भावनावेगात त्यांचे स्खलन झाले. आकाशातून भूमीवर पडताना त्या वीर्याचे दोन भागात विभाजन झाले. एक लोमश ऋषींच्या आश्रमाच्या कुंभात पडला, त्यापासून महर्षी अगस्तींचा जन्म झाला आणि दुसरा भाग कौलिक ऋषींच्या भिक्षापात्रात पडला. कौलिक ऋषी भिक्षा मागण्यासाठी पात्र घेऊन निघाले होते. हातातील पात्र अंगणात ठेवून दार बंद करू लागले आणि आकस्मिकपणे आकाशातून सूर्यरेत त्या पात्रात पडले. दार बंद करून कौलिक ऋषी पात्र घेण्यासाठी आले, पाहतात तर त्यांत त्यांना रेत दिसले. ते काय असावे या विचारांत मग्न असताना त्यांना योगचक्षुंद्वारा हे सूर्यनारायणाचे महातेज असल्याचे जाणवले. कलीयुगात या तेजापासून द्रुमिल नारायण अवतार धारण करणार असल्याचे त्यांना आकलन झाले. या रेताचे अमोलत्व लक्षात घेऊन त्यांनी ते पात्र तसेच सुरक्षित ठेवून त्याचे रक्षण केले. या घटनेनंतर पुष्कळ काळ उलटून गेला.

पुढे कलियुगाची सुरवात झाली. त्यासमयी कौलिक ऋषींनी ते पात्र मंदराचल पर्वतावरील एका गुहेच्या मुखाशी सुरक्षित ठेवले. कलियुगाचा तीन हजार एकशेतीन वर्षांचा काळ उलटला. तेव्हा द्वारकाधीश श्रीकृष्णाच्या पूर्वीच्या आदेशानूसार त्या महातेजात द्रुमिल नारायणाने संचार करून देह धारण केला. जीवाचा संचार झाल्यामुळे अपरिहार्याने देहाची वाढ होऊ लागली. दरम्यानच्या काळात मधमाशांनी त्या पात्राभोवती मधाचे पोळे तयार केले. मधमाशांनी कणाकणाने गोळा करून साठवलेल्या मधावर गर्भाचे पोषण होऊ लागले. यथावकाश नऊ महिने नऊ दिवसांच्या कालावधीत देह

परिपूर्णपणे वाढला. भर्तरीपात्र फार दिवसांचे जुनेपुराणे असल्याने कुजट झाले होते. गुहेच्या कड्यावरून निसटलेला एक पाषाण गडगडत खाली जात असताना त्याचा पुसटसा स्पर्श त्या पात्राला लागला आणि पात्र भंग पावले, त्याचे तुकडे तुकडेही झाले. त्याच्या भोवती असलेले मधाचे पोळेही दुभंगले आणि त्यांतून एक गोजिरवाणे तेजस्वी बालक बाहेर पडले. गाळ तळाशी बसल्यावर निर्मळ पाणी वर येते, तसे मधुवेष्टान दूर होऊन बालक बाहेर आले. पाषाणाच्या गडगडणाऱ्या आवाजाने आणि पोळे भंगल्यामुळे मधमाशा घोंगावात भिऊन सैरावैरा उडून गेल्या. नवजात बालकसूद्धा घरंगळत गुहेच्या मुखाबाहेरील गवतावर येऊन स्थिर झाले. एकटेच पडलेले ते बाळ कोवळया आवाजात रडत असे तर कधी शांतपणे पडून राही. अशातच त्या हिरव्यागार लुसलुशीत गवतांचा चारा चरण्यासाठी हिरणीचा कळप तेथे आला. त्या कळपातली एक हिरणी दैवयोगाने नेमकी त्या बाळाच्याजवळ व्याली तिला दोन पाडसे झाली. हरिणी वळून मागे पाहते तर मागे तीन बछडी चळवळ करताना दिसली. ही तीन तान्हुली आपलीच समजून ती त्यांना चाटू लागली, काही वेळाने दोन्ही पाडसे डगमगत उठली आणि हिरीणीचे स्तन चोखू लागली. तिसऱ्या तान्हुल्याला मात्र उठता येत नव्हते. त्याच्या उठायची वाट पाहून काळजीत पडलेल्या हिरीणीने, पाय वाकवून बाळाच्या मुखाशी कास नेऊन स्तनाग्रे मुखात घालताच बाळ चुरूचुरू दुध चोखू लागले. त्या मृगमातेला भरपूर पान्हा आला. दुग्धपान करून तान्हुला तृप्त झाला. काही दिवसांनी तिची दोन पाडसे उड्या मारीत हुंदडू लागली परंतु तिसरे मात्र तसेच पडून होते. हरिणी मात्र आपल्या या पाडसाला सोडून दूरवर चरावयास जात नसे. जवळपासच्या हिरवळीवर चरायाची आणि बाळाच्या ओढीने पुन्हा पुन्हा परतून त्याला दुध पाजून जाईची. काही दिवसांनी बाळ रांगू लागले. तेव्हा स्वतः होऊन मातेचे स्तन मुखास घेण्यास शिकले. उशिरा का होईना, बाळाला स्तन धरता येऊ लागल्याने मृगमाता आनंदित झाली. आतापर्यंत तिची दोन पाडसे गावात खाण्यास शिकली होती. हे तिसरे पाडस अशक्त असावे, या समजुतीने हरिणी त्याच्याकडे जास्त ममतेने लक्ष देऊन त्याला चाटून चाटून स्वच्छ राखत असे. अनेक वेळा त्याला पाजून चरावयास जाणे, आल्यावर पुन्हा पाजणे असा तिचा रोजचा कार्यक्रम असायचा. बघता बघता दोन वर्षांचा कालावधी लोटला. बाळाला चालण्याचे बळ आल्यावर आपल्यासोबत चरावयास घेऊन जाऊ लागली. हरिणीच्या कळपांमध्ये मानवी बालक दोन्ही हात पाय जमिनीला टेकवत चतुष्पादाप्रमाणे चालत गवत, झाडपाला खाऊ लागले. हरिणीच्या मेंमेच्या आवाजास हा सुद्धा 'मेंमें' आवाजात प्रतिसाद देत असे. हत्तीचे चीत्कारणे, गाईम्हशींचे हुंबरणे, वाघसिंहिणीच्या डरकाळया, कोल्हाची कोल्हेकुई, लांडगे, गेंडा, सांबर, इत्यादी प्राण्यांच्या भाषा समजू लागल्या. सर्प, किडा, मुंगी, पाली, पक्षी यांची बोली जाणून आपणही त्याच भाषेत उत्तर देई. कळपाबरोबर हरिणीच्या मागे मागे जात असे. हरीणही त्याला सोडून क्षणभरही राहत नसे. जागावेगळे पाडस म्हणून ममतेने त्याचे संगोपन करीत असे.

एके दिवशी हरिणींचा हा कळप चरत चरत रानातून जाणाऱ्या रस्त्यानजीक आला. त्या रस्त्याने जयसिंग आणि रेणुका नामक भट दांपत्य प्रवास करीत होते. तर हे उभयतां अत्यंत धार्मिक वृत्तीचे होते. परमेश्वरावर श्रद्धा असणारे ते दांपत्य अरण्य मार्गवरून जात असताना त्यांनी हरिणीच्या कळपातील मानवी बालक पहिले. ते दिव्य तेजस्वी बालक अतिशय देखणे होते. जयसिंग रेणूकेला म्हणाला, "तो बघ, असा गोजिरवाणा देखणा बालक कुणाचा असावा? कोणत्या निष्ठूर मातापित्याने याला अरण्यात सोडला असेल? किंवा हाच चुकून इकडे आला असेल?" असे दबक्या आवाजात बोलत ते बालकाजवळ आले. आजपर्यंत दोन पायाच्या मानवप्राण्याला कधीच पहिले नसल्याने बालकाने घाबरून चारी पायावर उड्या मारीत पळ काढला. हरणीने ओरडून ओरडून त्याला जोरात पाळण्याची सूचना केली पण जयसिंगाने

पाठलाग करून त्याला पकडला. हाताच्या मनगटाला धरून उभा केला, मनगट सोडताच पुन्हा तो चारी पायावर उभा राहिला, जयसिंग म्हणाला, "बाळा घाबरू नकोस, सरळ उभा रहा. मी तुला तुझ्या मातेकडे नेईन. तुझ्या मातेचे नाव काय ते सांग? पण ते बालक नुसते आक्रंदत होते. रडून रडून मृगमातेला बोलावीत होते. तिकडून हरिणी आक्रंदन करीत होती. माणसांच्या भयामुळे जवळ न येता आजूबाजूने वेढे घालीत होती. जयसिंग बाळाला घेऊन निघाला. तेव्हा आडबाजूने ओरडत ती हरीणीसुद्धा मागे निघाली. बालक तिच्याकडे पाहत रडून आक्रोश करीत आहे. जयसिंग त्याला समजावीत म्हणाला, "बाळा! रडू नकोस, तुझे माता पिता वनात चुकलेत का? मला त्याचे नाव सांग. मी त्यांच्याकडे तुला नेऊन सोडतो." बालकाला काही काही कळले नाही. ते फक्त में में बँ बँ करून रडत राहिले. भटाला वाटले हे मुके असावे, म्हणून हातवारे करून विचारू लागला, परंतु बालकाला त्या खाणाखुणाही कळल्या नाहीत. जयसिंग भटाने कपाळावर हात मारून घेतला, मनात म्हणाला, "अरेरे! हा तर ठार वेडा आहे, अज्ञानी बालक आहे. येथे हिंस्र पशूंच्या अरण्यात एकटा सोडण्याऐवजी याला आपण आपल्या सोबत घेऊन जाऊ, याचे जन्मदाते जर कुठे भेटले तर त्यांच्याकडे याला सुपूर्द करू." अशा विचाराने त्याने बाळाला खांद्यावर टाकले. ते जास्तच आरडा ओरडा करू लागले. भटाला काहीच अर्थबोध होईना ही हरिणी हुंबरडा का फोडते आहे? कदाचित तिचेही पाडस चुकले असावे? अज्ञानी बालकाचे वेडे चाळे समजून त्याला घट्ट पकडून घेऊन निघून गेला. ते दांपत्य गावाजवळ आले. मनुष्यवस्ती सुरु झाल्याने निराश झालेली हरिणी अरण्यात परतली पण ठायी ठायी उभी राहून मागे वळून हंबरडा फोडीत होती. तिचे पाडस मात्र दूर नजरेआड जात होते.

बालकासह ते दांपत्य गावात आले व तिथेच राहू लागले. बाळाला रेणुकेजवळ सोपवून तो दिवसभर वस्तीत फिरून सायंकाळी राहुटीत परतायचा. त्या गावात त्यांनी तीन मास वास्तव्य केले. बालकाला कालपरत्वे मृगमातेचा विसर पडला. रेणुकाने त्याला खाण्यापिण्याच्या मानवी सवयी लावल्या. बोबडे बोल बोलायला शिकविले. तो लहानगा रेणुकेला 'माता' आणि जयसिंगाला 'ताता' म्हणून बोबडी हाक मारीत खायला मागू लागला, हळू हळू बालकात अपेक्षित सुधारणा झाल्या.

गावोगावी मुक्काम करीत भट दांपत्य भगिरथीच्या तीरावरील काशी क्षेत्रात आले. जयसिंग काशी विश्वेश्वराचे दर्शन घेण्यासाठी बालकासह मंदिरात गेला. शिवपिंडीचे दर्शन करीत असताना गाभाऱ्यातून धीरगंभीर मंत्रमुग्ध करणारे शब्द प्रकटले, "यावे, यावे भर्तरी! आपले स्वागत आहे. भूलोकात आपण अवतारलात म्हणायचे." ते शब्द ऐकून भट थक्क झाला. "बालकाने शिवपिंडीला नमस्कार करताच 'भर्तरी' असे नाव घेऊन शिवलिंग बोलले! नक्कीच हा बालक असामान्य आहे. अवतारी आहे. चालता चालता सहज ठेच लागून खजिना सापडावा, किंवा चिंतामणी प्राप्त व्हावा. अथवा भुकेने प्राण कंठाशी आल्यावर साक्षात कामधेनुने दुग्धपान करवावे त्याप्रमाणे पूर्व पुण्याईचे फळ म्हणून नशिबाने हा बाळ आम्हाला सापडला, आमचे भाग्याच थोर म्हणायचे. पाषाणाचे शिवलिंग मनुष्यवाणीत बोलल्याचे या कानांनी ऐकले! "यावे भर्तरी!" आनंद आणि अद्भुतता यांच्या लहरीवर स्वार होऊन भटाने घरी आल्या आल्या पत्नी, रेणुकेला सर्व वृत्त सांगितले. अत्यानंदाने तिने भर्तरीला मिठीत घेतले.

उमारमणाने 'भर्तरी' हेच नाव घेऊन हाक मारली, त्याचे कारण भर्तरीत म्हणजे भिक्षापात्रात जन्म झाला म्हणून ते समर्पक नाव ठेवले. जयसिंग आणि रेणुका भर्तरीचे लाडात, कोडकौतुकात संगोपन करीत आहेत. कारण त्यांनाही मुले

नव्हती. भर्तरी हाच आपला कुलदीपक समजून त्याचे ममतेने संगोपन करीत होते. त्याच्यासाठी गोड पदार्थांची लयलूट करीत असत. वस्त्रालंकाराने त्याला नटवीत. भर्तरी अंगणात खेळत असे, एक पाय उडवून नाचे, बोबड्या आवाजात गाणे गाई. दुडूदुडू धावत येऊन मातेच्या गळयात पडे. रेणुका त्याला कुरवाळून त्याचा मुका घेई. मायलेकरे एकमेकांना हसतमुख ठेवत. आता भर्तरी पाच वर्षांचा झाला. रेणुकेच्या मनात येई की "ईश्वरी कृपेने भर्तरी आम्हास मिळाला आहे पण याचे जन्मदातेही वेडेपिसे होऊन याला शोधत असतील. योगायोगाने ते जर कुठे भेटले तर त्याला ओळखून घेऊन जातील मग आम्ही काय करावे?" अशा विचारांनी ती खिन्न होई, मग उभयतांनी विचार केला, जर याचे मत पिता याचा शोध घेत असतील तर केव्हा ना केव्हा या तीर्थक्षेत्रावर यांची भेट होईल. तेव्हा आपण काही काळ येथेच राहून उदरनिर्वाह करावा.

भर्तरी सवंगड्यांमध्ये खेळत आहे, स्वतः राजा झाला आहे, सर्व मुलांना काठीरूपी घोडे दिले आहेत, घोडेस्वार रंगेत उभे आहेत, मंत्री, सेनापती, सेवक, सैनिक ही सारी मंडळी राजदरबारात आपापल्या मकदुराप्रमाणे उभी आहेत आणि "छत्रपती, महाराजाधिराज, भर्तरीचा विजय असो!' अशा घोषणा करीत आहेत, विशेष म्हणजे हा निव्वळ खेळ नव्हता तर भविष्यकाळाची ती झलक होती. विधीलिखित काही अगम्य होते.

एके दिवशी काठीच्या घोड्यावर स्वार होऊन महाराज भर्तरी घोडदौड करीत दूरवर गेले. त्यांच्यासोबत मंत्रीगण, सेनापती आणि सैनिकसुद्धा दौडत आहेत. बरेच अंतरावरील निर्मनुष्य परिसरात पोहोचले दौडतांना वास्तव निर्माण व्हावे म्हणून घोड्यांच्या पावलांचा टप टप आवाज तोंडाने करावयाचा, घोड्याच्या पाठीवर थाप मारायची, त्याला हो हो हो, म्हणत सावरायचे असे मोठ्यांचे तंतोतंत अनुकरण चालले होते. खेळ असा रंगात आला असताना महाराज म्हणजे बाळ भर्तरी ठेच लागून पडला. जिव्हारी मार बसल्याने शुद्ध हरपली, डोळे पांढरे झाले. त्याला निपचित पडलेला पाहून मुलांची त्रेधातिरपिट उडाली. मुले घाबरून घराकडे पळत सुटली. "भर्तरी मेला, आता तो भूत होईल, आता आपली धडगत नाही, पळा रे पळा!!" असे म्हणून जीवाच्या आकांताने मुलांची पळापळ सुरु झाली. एकही मूल थांबले नाही. विसावा घेण्यासाठी भगीरथीच्या घाटाजवळ आली. भयकंपित होऊन एकमेकांना दिलासा देत आहेत, "बरे झाले, आपण त्या ओसाड जागेतून पळालो, नाहीतर आपला जीवच गेला असता. चला आता! आपापल्या घरी जाऊन खेळू यां." असं एकमत होऊन सर्व मुले गावात निघून गेली.

इथले चित्र असे होते की धरणीवर पडलेल्या भर्तरीला मूर्च्छा आली आहे. खडकाळ जमिनीवरील दगड, धोंडे, खड्यांनी शरीरावर जखमा होऊन रक्त वाहत आहे. डोळे पांढरे झाले आहेत. प्रखर उन्हाने घशाला कोरड पडली आहे. भर्तरीची ती अवस्था पाहून सूर्य नारायणाला अपत्य वात्सल्याचा उमाळा दाटून आला. मानव रूप धारण करून त्याने तिथे येऊन भर्तरीला उचलले आणि भगीरथीचे पाणी तोंडावर शिंपडले, त्याच्या मुखात पाणी पाजले. हाका मारून, हलवून हलवून त्यास सावाध केले. त्याच्या शरीरावरील जखमा आपल्या कृपास्पर्शाने अदृश्य केल्या. ममतेने त्यास जवळ घेतले. ब्राह्मणाच्या वेशातील सूर्यनारायण भर्तरीचा हात धरून गावात आला. त्यांना पाहून मुले "अरे! हा भूत होऊन परतला की काय या भयाने आपापल्या घरात जाऊन दडून बसली. ब्राम्हणाने रेणुकेस हाक मारून भर्तरीस सांभाळण्यास सांगितले. सात्विक आणि श्रद्धाळू वृत्तीच्या रेणुकेने ब्राह्मणाचे दर्शन घेऊन बसण्यासाठी वस्त्राचे आसन अंथरले आणि हात जोडून म्हणाली, "महाराज! आपण बसावे, आपण फारच कनवाळू दिसता, बाळाचे हात धरून ममतेने त्याला घरी

घेऊन आलात. कोण आपण? आपले गाव कोणते, आपले शुभ नाव काय आहे? त्यावर ब्राह्मणाच्या वेशातील सूर्यदेव म्हणाले, “मुली, मी या बालकाचा जन्मदाता आहे. म्हणून त्याच्यावरील अपत्यप्रेमाने मी येथे आलो आहे. हे बालक आता तुझेच आहे. निःसंशय होऊन याचा सांभाळ कर.” “महाराज आपण या बालकाचे जनक कसे?” “मुली, मी मानव नसून विप्रवेषधारी सूर्यदेव आहे.” असा प्रारंभ करीत भर्तरीच्या जन्माच्या सर्व कथेचे निवेदन केले आणि शेवटी म्हणाले, “आता या दिव्य अवतारी बाळाचे ममतेने संगोपन कर, याच्या जीवनगाथेशी तुमचे नाव जोडले जाऊन अमर होणार असल्याने, तुम्ही परमभाग्यशाली आहात.” एवढे सांगून ते अंतर्धान पावले. भर्तरी आता केवळ आपलाच आहे, या आनंदात रेणुका जयसिंगाची प्रतीक्षा करीत होती. तो येताच त्याला सर्व वृतांत सांगितला, दोघेही अतिशय आनंदीत झाले. मलीनता जाऊन वस्त्र शुद्ध आणि निर्मळ व्हावे त्याप्रमाणे मनाला निर्मलता आली. मनातला संशय नाहीसा झाला. दिवसामागून दिवस जात होते. काशीक्षेत्री वास्तव्याची आणखी पाच वर्षे निघून गेली. भर्तरीने सोळाव्या वर्षात पदार्पण केले. भट दांपत्य एकत्र बसून भर्तरीच्या लग्नाचा विचार करीत असायचे. आपल्या देशातील जाती संबंधातली एखादी सुलक्षणी कन्या पाहण्याच्या निश्चयाने त्यांनी काशी क्षेत्रातला मुक्काम हलवण्याचे ठरविले.

माळवा देशातील त्यांच्या गावाकडे मजल दरमजल करीत निघाले. प्रवासात एक दुर्घटना घडली. एकाकी अशा एका गर्द अरण्यात वाटमाऱ्या लुटारूंनी हल्ला करून जयसिंगाला ठार मारले आणि जवळ होते नव्हते तेही लुटून नेले. पतीच्या मृत्यु आघाताने रेणूकेनेही प्राण सोडले. शोकमग्न भर्तरीने अरण्यातून लाकडे गोळा केली. मतपित्यांना एकाच चितेवर ठेवून अग्नीसंस्कार केला. निराधार झालेला भर्तरी भडकणाऱ्या अग्नी ज्वाळांकडे पाहतो आहे, त्याच्या हृदयातही दुःखाची चिता पेटली आहे. दारुण शोकाने तो बरळतो, “ताता माता! मला या वनात निराधार करून कसे गेलात? तुम्ही दोघांनाही एकदम परलोकी गमन केले. आता माझे मायेचे कुणीही उरले नाही. रेणुका माते! मी आता आई आई म्हणून कुणाला हाक मारू? माते का अशी निष्ठुर झालीस? ताता माझ्या शिरावरचे पितृछत्र का काढून घेतलेस? बाहेरून घरी परतताना तुम्ही माझ्यासाठी पागोट्यात खाऊ बांधून आणत होतात. माझ्या दयाघना ताता, मला टाकून का गेलात? मतपित्यांचे एकाच वेळी निधन या दुहेरी दुःखाला अंत नाही. काळवेळेचे भान हरवले आहे. चिता जळून शांत झाली. अग्नी विझला पण भर्तरी काही भानावर येत नाही. शून्य नजरेने एकटक राखेकडे पाहात बसून आहे.

दुसऱ्या दिवशी त्या मार्गाने व्यापाऱ्यांचा तांडा बैलगाड्यांतून सामान भरून चालला होता. त्यांनी भर्तरीची विचारपूस करून सांत्वन केले आणि म्हणाले, “विधीलिखित कुणालाही चुकत नाही, दुर्भाग्याने जे घडायचे ते घडून गेले आहे, आता शोक करून मातापिता परत येणार आहेत का? आपलेच नशीब फुटके असे समजून धीर धर, शोक आवर आणि चल आमच्या बरोबर.” असे म्हणून त्याचा हात धरून, उठवून त्याला घेऊन गेले.

प्रत्येक दिवशी मजल दरमजल करीत व्यापाऱ्यांचा तांडा पुढे पुढे वाटचाल करीत आहे. भर्तरी सुद्धा दुःखावेगातून सावरला आहे. व्यापाऱ्यांचा समवेत मिळून मिसळून त्यांची कामे करू लागला आहे. त्याची नम्रता, कष्टाळू वृत्ती, कामातील नीटनेटकेपणा याबरोबरच त्याचे देखणे रूप यामुळे अल्पावधीतच तो सर्वांचा लाडका झाला. व्यापाऱ्यांचासोबत तो उज्जैन शहरातील अवंती नगरीकडे निघाला.

फलश्रुती: या अध्यायाच्या पठणाने पूर्वजन्मीचे बालहत्येचे पातक नष्ट होऊन मुले वाचतील. स्त्रीयांचा वांझपणा जाऊन संततीलाभ होईल.